**मुख्यमंत्री अन्नपूर्णा योजनेच्या प्रसिध्दीसाठी माध्यम आराखडयास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:- घगॅस-२०२४/प्रक्र ५८/नापु-२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: १४ ऑगस्ट, २०२४

संदर्भ: १) शासन निर्णय समक्रमांक दि.३० जुलै, २०२४,
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. मावज-२०२१/प्रक्र १२६/का.३४, दि.१३.०८.२०२१,
३) माहिती व जनसंपर्क संचालनालयाच्या माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजावणी समितीच्या दि.०६ ऑगस्ट, २०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री उज्ज्वला योजनेच्या राज्यातील सुमारे ५२.१६ लक्ष लाभार्थ्यांना तसेच मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण योजनेच्या पात्र लाभार्थ्यांच्या कुटुंबाला वार्षिक ३ गॅस सिलेंडरचे पुनर्भरण (Refill) मोफत उपलब्ध करून देण्यासाठी **"मुख्यमंत्री अन्नपूर्णा योजना"** राबविण्याचा निर्णय शासनाने दि.३० जुलै, २०२४ रोजी घेतला आहे. सदर योजनेची माहिती व लाभ पात्र लाभार्थ्यांपर्यंत पोहचविण्यासाठी सोशल मिडीया, रेडिओ जिंगल्स, बेस्ट बसेस व एस.टी. बसेस बॅनर्स, खाजगी होर्डिंग्ज, वृत्तपत्र या माध्यमाव्दारे प्रसिध्दी करावयाचे प्रस्तावित आहे.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या जाहिरात व प्रसिध्दी इत्यादी करीता मागणी क्रमांक एम-३, ३४५१, सचिवालयीन आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (००) (०१) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग (खुद्द) (अनिवार्य) (३४५१०१६२) २६, अंतर्गत रुपये १०,००,००,०००/-(रुपये दहा कोटी) इतक्या रक्कमेपैकी ३,६८,००,००० (रु.तीन कोटी अडुसष्ट लक्ष) इतकी रक्कम उपलब्ध आहे. तसेच सन २०२४ च्या गौरी-गणपती उत्सवानिमित्त वितरीत करावयाच्या आनंदाचा शिध्याकरीता होणारा खर्च "मागणी क्र. एम-४, मुख्य लेखाशिर्ष ४४०८- अन्न साठवण व वखार यावरील भांडवली खर्च, ०१ अन्न, १०१-प्रापण व पुरवठा, ०२ प्रापण वितरण व किंमत नियंत्रण (०२) (०५) मुंबई शहर अन्नधान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च (अनिवार्य) (४४०८०२६४) ५०-इतर खर्च" या लेखाशिर्षांतर्गत जाहिरात प्रसिध्दीकरिता रु.१,२०,००,०००/-(अक्षरी रुपये एक कोटी वीस लक्ष रुपये) इतक्या रक्कमेची तरतुद करण्यात आली आहे. त्यानुसार वरील दोन्ही लेखाशीर्षांखाली असलेली एकूण रुपये ४.८८ कोटी इतकी रक्कम मुख्यमंत्री अन्नपूर्णा योजनेच्या जाहिरात व प्रसिध्दीसाठी उपलब्ध आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१३.०८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार शासकीय जाहिराती वितरण धोरणाच्या अमंलबजावणीची कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार विभागाच्या मुख्यमंत्री अन्नपूर्णा योजनेच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी रु.४.८८ कोटी रक्कमेच्या माध्यम आराखड्यास माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा व नियोजन समितीच्या दि.०६.०८.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. सदर आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या मुख्यमंत्री अन्नपूर्णा योजनेच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा व नियोजन समितीच्या दि.०६.०८.२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मंजूरी देण्यात आलेल्या माध्यम आराखडयास तसेच तो राबविण्यासाठी येणाऱ्या रु.४,८७,९२,४०० (अक्षरी चार कोटी सत्त्याऐंशी लक्ष ब्याण्यव हजार चारशे) इतक्या खर्चास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात येत आहे. या प्रचार व प्रसिध्दी माध्यम आराखडयानुसार येणाऱ्या अंदाजित खर्चाचा तपशील सोबत जोडलेल्या विवरण पत्र-अ नुसार राहील.

२. प्रस्तुत बाबीकरीता होणारा खर्च मागणी क्रमांक एम-३, ३४५१, सचिवालयीन आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (००) (०१) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग (खुद्द) (अनिवार्य) (३४५१०१६२) २६, जाहिरात व प्रसिध्दी या लेखाशीर्षंतर्गत सन २०२४-२५ मधील मंजूर केलेल्या तरतुदीमधून रु.३.६८ कोटी (रु.तीन कोटी अडुसष्ट लक्ष फक्त) इतका खर्च तसेच "मागणी क्र. एम-४, मुख्य लेखाशिर्ष ४४०८- अन्न साठवण व वखार यावरील भांडवली खर्च, ०१ अन्न, १०१-प्रापण व पुरवठा, ०२ प्रापण वितरण व किंमत नियंत्रण (०२) (०५) मुंबई शहर अन्नधान्य खरेदीवरील अनुषंगिक खर्च (अनिवार्य) (४४०८०२६४) ५०-इतर खर्च" या लेखाशिर्षाखाली जाहिरात प्रसिध्दीकरिता मंजूर केलेल्या तरतुदीमधून रु.१.२० कोटी (रु.एक कोटी वीस लक्ष फक्त) इतका खर्च भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रम राबविण्यासाठी खर्च करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/आदेश/परिपत्रके यानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, दि.१७/०४/२०१५ अन्वये निर्गमित नियम पुस्तिका १९७८ मधील तरतुदींचे/अटी व शर्तीचे पालन करुन तसेच खरेदी प्रक्रियेबाबत विहीत तरतूदींचे व कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१४१६४२३१७१०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Food Civil Supplies and Consumer Protection Depart, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9915405908628d01955f3675acc122f51e0c39f63f7cc88eec49cd05616991fd, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2024.08.14 16:57:12 +05'30'

**( तातोबा कोळेकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.विरोधी पक्षनेते (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्मानीय विधानसभा / विधान परिषद सदस्य,
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव,
८. सर्व विभागीय आयुक्त,
९. सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर व उपनगर वगळून),
१०. नियंत्रक शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा मुंबई,
११. नियंत्रक, वैधमापनशास्त्र, मुंबई,
१२. उप सचिव (ग्रा.सं.-२) व उप सचिव (नापु-२२), अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,
१३. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई,
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर,
१५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर,
१६. राज्यस्तरीय समन्वयक, तेल उद्योग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. सर्व उप आयुक्त (पुरवठा) ,
१८. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
१९. सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी
२०. सर्व उपनियंत्रक (शिधावाटप) मुंबई/ठाणे
२१. निवडनस्ती (कार्यासन नापु-२७).

## विवरणपत्र "अ"

**शासन निर्णय अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्रमांक-घगॅस २०२४/प्रक्र ५८/नापु-२७, दिनांक: १४.०८.२०२४ चे सहपत्र.**

| अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या मुख्यमंत्री अन्नपूर्णा योजनेच्या प्रचार व प्रसिध्दी माध्यम आराखड्याचा तपशील | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| क्र. | माध्यम | स्वरुप | तपशील | रक्कम (प्रती नग) | संख्या | रक्कम | जीएसटी | एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित) |
| १ | प्रिंट | | प्रिंट आणि इतर बाहय माध्यमांकरिताजाहिरातीचा मजकूर (Adaptation, Translation forming from one media to other media) | १०,००० | ४ | ४०,००० | ७,२०० | ४७,२०० |
| | टिव्हिसी | | TVC-६० Sec.Asper DAVP rate | ७,००,००० | २ | १४,००,००० | २,५२,००० | १६,५२,००० |
| | जिंगल / स्पॉट | | Audio jingle (६० Sec.) | ४५,००० | ४ | १,८०,००० | ३२,४०० | २,१२,४०० |
| | TOTAL-A | | | | | १६,२०,००० | २,९१,६०० | १९,११,६०० |
| | जाहिरात प्रसिध्दी तपशील (Details of Advertisement) | | | | | | | |
| क्र. | Media | मूळ दर प्रक्रिया | Details | वारंवारिता | संख्या / दिवस | एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित | जीएसटी | एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित) |
| | मुद्रित माध्यमे (जाहिरात शाखा) | | | | | | | |
| १ | वर्तमान पत्रे | शासनमान्य दर | वृत्तपत्र जाहिरात (राज्यातील मोठा आणि मध्यम संवर्गातील निवडक मराठी दैनिके) | नमूद अंदाजित रक्कमेच्या मर्यादेत | १ दिवस | २५,००,००० | १,२५,००० | २६,२५,००० |
| | इलेक्ट्रॉनिक माध्यमे (वृत्तचित्र शाखा) | | | | | | | |
| १ | आकाशवाणी | CBC (DAVP) दर | आकाशवाणी केंद्रावरुन ऑडियो जिंगल्सचे प्रसारण | नमूद अंदाजित | ३० दिवस | २०,००,००० | ३,६०,००० | २३,६०,००० |
| २ | एफ.एम. वाहिन्या | CBC (DAVP) दर | एफ.एम.वाहिन्या ऑडियो जिंगल्सचे प्रसारण | नमूद अंदाजित रक्कमेच्या मर्यादेत | ३० दिवस | २०,५०,००० | ३,६९,००० | २४,१९,००० |
| ३ | स्थानिक लोकल केबल | विहित ई-निविदा प्रक्रियाव्दारे | ४५ ते ६० सेकंदाच्या जाहिरातीचे प्रसारण- सदर माध्यमाव्दारे प्रसिध्दी करण्याकरिता DAVP दर उपलब्ध नाहीत.तथापि दि.१८ डिसेंबर २०२३रोजीच्या शासन निर्णयान्वये एकलस्त्रोत संस्था आणि जुने/ | नमूद अंदाजित रक्कमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ४०,००,००० | ७,२०,००० | ४७,२०,००० |

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | सद्यस्थितीतील व सममाध्यमांचे DAVP दराने आणि लोकल केबलव्दारे जाहिरात प्रसिध्दीसाठी जुन्या DAVP दराने मान्यता देण्यात आली आहे. सदर माध्यमाव्दारे प्रसिध्दीकरिता शा.नि. २३.११.२०२३ मधील संस्थांच्या सूचीमधील संस्थांमार्फत विहित कार्यपध्दतीचे अवलंब करुन प्रसिध्दी करणे शक्य होईल. | | | | | |
| ४ | एसटी बस डेपोतील सार्वजनिक उद्धघोषणा | CBC (DAVP) दर | राज्यातील एसटी बस डेपोतील स्थानकावरुन ऑडियो जिंगल्सचे प्रसारण | नमूद अंदाजित रक्कमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ४५,००,००० | ८,१०,००० | ५३,१०,००० |
| | **समाज माध्यमे व डिजिटल माध्यमे (नव माध्यम शाखा)** | | | | | | | |
| १ | सोशल मिडिया | विहित ई-निविदा प्रक्रियाव्दारे | शा.नि.२३.११.२०२३ मधील संस्थांच्या सूचीमधील संस्थां मार्फत विहित कार्यपध्दतीचे अवलंब करुन प्रसिध्दी करणे शक्य होईल. या माध्यमांच्या संस्थांनी निविदेमध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिध्दी करण्याचे प्रस्तावित. | नमूद अंदाजित रक्कमेच्या मर्यादेत | ३० दिवस | १,२५,००,००० | २२,५०,००० | १,४७,५०,००० |
| | **बाह्य माध्यमे** | | | | | | | |
| १ | खाजगी होर्डिंग | CBC (DAVP) यादीवरील दर | भाडे तत्वावरील खाजगी होर्डिंग्ज As per Availability | नमूद अंदाजित रक्कमेच्या मर्यादेत | ३० दिवस | १,१०,००,००० | २०,९०,००० | १,३०,९०,००० |
| | | | | TOTAL-B | | ३,८५,५०,००० | ६७,२४,००० | ४,५२,७४,००० |
| | | | | | | ४,०१,७०,००० | ७०,१५,६०० | ४,७१,८५,६०० |
| १ | | शासन निर्णय तरतुदी नुसार | माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाला येणारा कार्यालयीन उपकरणांवरील खर्च, सॉफ्टवेअर, तात्पुरता मनुष्यबळावरील खर्च, संशोधन खर्च, वाहतूक खर्च, इतर किरकोळ खर्च, | | | १६,०६,८०० | | १६,०६,८०० |
| | | | TOTAL EXPENDITURE | | | ४,१७,७६८०० | | ४,८७,९२,४०० |

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Food Civil Supplies and Consumer Protection Depart, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9915405908628d01955f3675acc122f51e0c39f63f7cc88eec49cd05616991fd, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2024.08.14 16:57:35 +05'30'

**( तातोबा कोळेकर )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**